**जिल्हा न्यायालय, धुळे येथील नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी /अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.याचिका ०२१७/११७/प्र.क्र.६२/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा : १. जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांचे पत्र क्र.१४८८/२०२०, दि.११/३/२०२०
२. मुख्य अग्निशमन अधिकारी, मालेगाव महानगरपालिका, मालेगाव यांचे पत्र क्र.मामनपा/अग्नि/जा.क्र./ ३९१/२०१८, दि.४/९/२०१८

**प्रस्तावना :**

मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.२१६/२०१० मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशांस अनुलक्षून राज्यातील सर्व न्यायालयीन इमारतीचे फायर ऑडीट करण्यात येत असून अग्निशमन यंत्रणा उभारणी/अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यात येत आहेत. या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे येथील नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भीय अ. क्र.१ येथील पत्रान्वये सादर केला आहे . सदर प्रकरणी सन २०१९-२०२० च्या दरसूचीवरील अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता (विद्युत) यांनी तयार केली असून उप अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे व कार्यकारी अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक व मुख्य अभियंता (विद्युत) , सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई तसेच प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे यांनी साक्षांकित केली आहेत. याबाबत मुख्य अग्निशमन अधिकारी, मालेगाव महानगरपालिका, मालेगाव यांनी अग्नी प्रतिबंधक उपाय योजनांचे तरतुदीप्रमाणे सदर कामे करणे आवश्यक असल्याचे कळविले आहे. त्यानुसार जिल्हा न्यायालय, धुळे येथील नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, धुळे येथील नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी पुढीलप्रमाणे एकूण रु.१,२७,०८,२३८/- ( अक्षरी रुपये एक कोटी सत्तावीस लाख आठ हजार दोनशे अडतीस फक्त) इतक्या अंदाजपत्रकास/खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४- न्यायदान, (००) १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश - (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (२०१४ ०१७२) (अनिवार्य), २७ लहान बांधकामे” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो पुरवणी मागणी /पुनर्विनियोजनाद्वारे / सुधारित अंदाजामध्ये भागवावा आणि आवश्यकतेनुसार त्या त्या आर्थिक वर्षासाठी आवश्यक तेवढी तरतूद त्या त्या वित्तीय वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज सादर करताना प्रस्तावित करुन त्याद्वारे भागवावा.

३. सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी अग्नीशमन अधिकारी यांनी निश्चित केलेल्या उपाय योजनांमधील कामे समाविष्ट असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी प्रमुखजिल्हा व सत्र न्यायाधीश,धुळे यांची राहील. प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रीया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी. अग्नीशमन अधिकारी यांनी सुचविलेल्या उपाययोजनांचे अनुपालन होईल याबाबत जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे यांनी दक्षता घ्यावी. तसेच याबाबतचा खर्च तांत्रिक मान्यतेपेक्षा जास्त होणार नाही यााबाबतची दक्षता घ्यावी.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) मधील तरतुदीनुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने तसेच वित्तविभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२३१/२०२२/व्यय ५ दि.२४/२/२०२२अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०११५३६५८७६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2022.04.01 15:38:51 +05'30'

( हेमांगी शेट्ये )

**कार्यासन अधिकारी**

**प्रत**

१) प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धुळे,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई
५) जिल्हा कोषागार अधिकारी ,धुळे,
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
७) विधि व न्याय विभाग (का.२३), मंत्रालय, मुंबई,
८) निवडनस्ती (कार्यासन ११)

********************************